**राज्यातील शासकीय अध्यापक विद्यालयातील विद्यार्थ्यांना सराव पाठ घेण्यासाठी उपलब्ध करून देण्यात आलेल्या शासकीय सराव पाठशाळा बंद करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-संकीर्ण-२०२०/प्र.क्र.५२/प्रशा-५**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
दिनांक:- १५ सप्टेंबर,२०२०

**संदर्भ** :- संचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद,महाराष्ट्र , पुणे, यांचे पत्र क्र.राशैसंप्रप/सेवापूर्वशिक्षण/२०२०-२१ दिनांक २९.७.२०२०

**प्रस्तावना:-**

राज्यातील शासकीय अध्यापक विद्यालयातील विद्यार्थ्यांना सराव पाठ घेणेसाठी संलग्न सराव पाठशाळा उपलब्ध करुन देण्यात आल्या होत्या. सद्यस्थितीत शासकीय अध्यापक विद्यालयातील विद्यार्थ्यांची कमी होत जाणारी संख्या व काही सराव पाठशाळेतील विद्यार्थीसंख्या शून्य झाली असल्याने तसेच उर्वरित सराव पाठशाळेतील विद्यार्थ्यांकरिता नजीकच्या परिसरात उपलब्ध असणारी प्राथमिक शिक्षणाची सोय विचारात घेता १० शासकीय सराव पाठशाळा कायमस्वरुपी बंद करण्यात येऊन या शासकीय सरावपाठ शाळेतील कार्यरत शिक्षकाचे व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांचे नियमानुसार इतरत्र समायोजन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

संचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र, पुणे यांनी प्रस्तावित केल्याप्रमाणे खालील तक्त्यात नमूद केलेल्या एकूण १० सराव पाठशाळा बंद करण्यात येत आहेत. सदर १० सराव पाठशाळांपैकी पुढील २ सराव पाठशाळांमध्ये विद्यार्थी नसल्यामुळे, सदर २ सराव पाठशाळा तातडीने बंद करण्यात येत आहेत. सदर २ सराव पाठशाळेमधील कार्यरत शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना दिनांक ३० नाव्हेंबर, २०२० पूर्वी अनुक्रमे समकक्ष शिक्षक व शिक्षकेतर रिक्त पदावर समायोजन करण्यात यावे.

| अ.क्र. | जिल्हा | विद्यार्थी संख्येअभावी बंद करावयाच्या शासकीय सराव पाठशाळेचे नाव |
|---|---|---|
| १ | पुणे | शासकीय अध्यापक सराव पाठशाळा लोणी काळभोर |
| २ | अमरावती | जिल्हा शिक्षण प्रशिक्षण संस्था संलग्न सराव पाठशाळा |

२. उर्वरित पुढील ८ सराव पाठशाळांमधील विद्यार्थ्यांचे समावेशन पुढील शैक्षणिक वर्षापासून नजिकच्या शाळेत करण्यात यावे.

| अ.क्र. | जिल्हा | पुढील शैक्षणिक वर्षापासून बंद करावयाच्या शासकीय सराव पाठशाळेचे नाव |
|---|---|---|
| १ | पुणे | शासकीय सराव पाठशाळा (उर्दू) भवानी पेठ |
| २ | पुणे | शासकीय सराव पाठशाळा (उर्दू) मोदीखाना |
| ३ | अमरावती | शासकीय सराव पाठशाळा वलगाव रोड |
| ४ | बुलढाणा | जिल्हा शिक्षण प्रशिक्षण संस्था संलग्न सराव पाठशाळा |
| ५ | अकोला | जिल्हा शिक्षण प्रशिक्षण संस्था,संलग्न सराव पाठशाळा |
| ६ | यवतमाळ | जिल्हा शिक्षण प्रशिक्षण संस्था संलग्न सराव पाठशाळा |
| ७ | नागपूर | शासकीय सराव पाठशाळा |
| ८ | वर्धा | शासकीय सराव पाठशाळा |

**३.** सदर सराव पाठशाळांमधील शिक्षकांचे व शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांचे समायोजन समकक्ष रिक्त पदावर करण्याबाबत आयुक्त (शिक्षण ) यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्रमांक २०२००९१५१६०२२८५१२१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Santosh Basaveshwar Mamadapure

Digitally signed by Santosh Basaveshwar Mamadapure
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3bfe111652996d95372924b1d22cdf88b33dfa2a3de3d8ea011b7d83adc40cb6, serialNumber=557abe7a7194ec5ddc74df537d7d57a9dbda20b1937a2e41983c35f6a38b6ad8, cn=Santosh Basaveshwar Mamadapure
Date: 2020.09.15 16:03:42 +05'30'

**( संतोष ममदापुरे )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य
२. मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
३. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
४. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५. मा. उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६. मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
७. सर्व सन्माननीय विधानसभा, विधानपरिषद सदस्य
८. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव , महाराष्ट्र राज्य
९. मा. उपमुख्यमंत्री,यांचे सचिव,महाराष्ट्र राज्य

१०.मा. मंत्री, शालेय शिक्षण, यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र राज्य,
११.मा. पालकमंत्री, पालघर जिल्हा, यांचे खाजगी सचिव,
१२.मा. राज्यमंत्री (शालेय शिक्षण), यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र राज्य,
१३. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
१४. संचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र, पुणे
१५.महालेखापाल, महाराष्ट्र ½ (लेखापरिक्षा), मुंबई/नागपूर
१६. महालेखापाल, महाराष्ट्र ½ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर
१७.सर्व सह सचिव व उप सचिव शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१८. सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक
१९.संबंधित जिल्हा कोषागार कार्यालय,
२०.सर्व अवर सचिव/कक्ष अधिकारी, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
२१.निवडनस्ती/प्रशा-५